भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांतील प्रशासकीय मान्यता प्राप्त नागरी सुविधा कामांकरिता निधी मंजूरीबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१९/३९७/प्र.क्र.१०४/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०६/१२/२०१९

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५
४) विभागीय आयुक्त, पुणे यांचे आदेश क्र.पुनर्व/कावि-४/६५५-६५६-६५७/२०११, दि.२९.१२.२०११
५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१२/२/प्र.क्र.१/र-८, दि.२२.३.२०१२
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१२/२/प्र.क्र.१/र-८, दि.२६.३.२०१२
७) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१२/२/प्र.क्र.१/र-८, दि.२७.३.२०१२
८) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१२/२/प्र.क्र.१/र-८, दि.२८.३.२०१२
९) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१३/९६/प्र.क्र.४९/र-८, दि.१२.८.२०१३
१०) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१३/९६/प्र.क्र.४९/र-८, दि.१२.२.२०१४
११) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१३/९६/प्र.क्र.४९/र-८, दि.२१.३.२०१४
१२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१३/९६/प्र.क्र.४९/र-८, दि.२८.३.२०१४
१३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१५/३०३/प्र.क्र.४५/र-८, दि.१.३.२०१६
१४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.पुनर्व-२०१९/१२७/प्र.क्र.२९/र-८, दि.२८.३.२०१९
१५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.पुनर्व-२०१९/१२७/प्र.क्र.२९/र-८, दि.६.७.२०१६
१६) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे यांचे पत्र क्र.पुपामं/अर्थ/६९२३/२०१९, दि.०४.०९.२०१९
१६) महसूल व वन विभाग शासन पत्र क्र.पुनर्व-२०१९/३९७/प्र.क्र.१०४/र-८, दि.१८.९.२०१९
१७) कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे यांचे पत्र क्र.पुपावि/लेशा/५७०४/२०१९, दि.२१.९.२०१९
१७) महसूल व वन विभाग शासन पत्र क्र.पुनर्व-२०१९/३९७/प्र.क्र.१०४/र-८, दि.१०.१०.२०१९
१८) कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे यांचे पत्र क्र.कुशा/पुन/७०२६/२०१९, दि.३.१२.२०१९

प्रस्तावना :-

भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्ह्यातील भोर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र.४ च्या आदेशान्वये विभागीय आयुक्त स्तरावर प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. प्रशासकीय मान्यतेनुसार निधी मागणी प्रस्ताव अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे यांनी दि.४.९.२०१९ रोजीच्या संदर्भाधीन क्र.१६ येथील पत्रान्वये शासनास सादर केला होता. प्राप्त प्रस्तावात त्रुटी असल्याने, त्यानुषंगाने, शासनपत्र दि.१८.९.२०१९ च्या पत्रान्वये सुधारित मागणी प्रस्ताव सादर

करण्याबाबत व दि.१०.१०.२०१९ रोजीच्या पत्रान्वये त्रुटी पुर्तता करण्याबाबत कळविण्यात आले. त्यास अनुसरुन कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे यांनी त्यांच्या दि.२१.९.२०१९ रोजीच्या पत्रान्वये सुधारित मागणी प्रस्ताव सादर केला व दि.३.१२.२०१९ रोजीच्या पत्रान्वये त्रुटी पुर्तता केली आहे.

२. भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्हयातील भोर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील मागणी करण्यात आलेल्या कामांपैकी काही नागरी सुविधा कामांना प्रगतीनुसार, निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

तद्नुषंगाने, भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्हयातील भोर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांसाठी प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत एकूण रू.१,३४,२८,०००/- निधी सन २०१९-२०२० या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२. तदनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, भाटघर प्रकल्पांतर्गत पुणे जिल्हयातील भोर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील खाली नमूद नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.१,३४,२८,०००/- (रुपये एक कोटी चौतीस लक्ष अठ्ठावीस हजार फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी, १०-४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, पुणे यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे:-**

| अ क्र | पुनर्वसित गावाचे नाव | नागरी सुविधा काम | वितरीत निधी (रुपयात) |
|---|---|---|---|
| १) | मौजे ब्राम्हणघर | बस थांबा बांधणे | १,८९,०००/- |
| २) | मौजे जयतपाड | बस थांबा बांधणे | ४,०३,०००/- |
| ३) | मौजे कोंडगाव | बस थांबा बांधणे | ३,८७,०००/- |
| ४) | मौजे कोंडगाव (सोनारवाडी) | बस थांबा बांधणे | ३,७३,०००/- |
| ५) | मौजे नानावळे (धनगरवस्ती) | बस थांबा बांधणे | ३,८२,०००/- |
| ६) | मौजे तळे (म्हसवली) | बस थांबा बांधणे | २,१७,०००/ |
| ७) | मौजे म्हसवली | ग्रामपंचायत कार्यालय बांधणे | ८४,०००/- |
| ८) | मौजे पांगारी (नानवले आश्रमशाळा) | प्रसाधनगृह बांधणे | ३,७०,०००/- |
| ९) | मौजे संगमनेर | प्रसाधनगृह बांधणे | ३,६९,०००/- |
| १०) | मौजे हर्णस | स्मशानभूमी बांधणे | १,८७,०००/- |
| ११) | मौजे कोंडगाव | स्मशानभूमी बांधणे | ४,९८,०००/- |
| १२) | मौजे लव्हेरी | स्मशानभूमी बांधणे | ४,५९,०००/- |
| १३) | मौजे नऱ्हे | स्मशानभूमी बांधणे | ४५,०००/- |
| १४) | मौजे ब्राम्हणघर | पोहोच रस्ता तयार करणे | १०,२४,०००/- |

| अ क्र | पुनर्वसित गावाचे नाव | नागरी सुविधा काम | वितरीत निधी (रुपयात) |
|---|---|---|---|
| १५) | मौजे चांदवणे | पोहोच रस्ता तयार करणे | ८०,०००/- |
| १६) | मौजे खुलशी | पोहोच रस्ता तयार करणे | १,४३,०००/- |
| १७) | मौजे कोंडगाव | पोहोच रस्ता तयार करणे | ११,७९,०००/- |
| १८) | मौजे कुंबळे | पोहोच रस्ता तयार करणे | १,८४,०००/- |
| १९) | मौजे लव्हेरी | पोहोच रस्ता तयार करणे | १०,४१,०००/- |
| २०) | मौजे माजगाव | पोहोच रस्ता तयार करणे | २,४४,०००/- |
| २१) | मौजे आस्कवडी | पोहोच रस्ता व त्यावरील मोरी बांधकाम करणे | ८,१७,०००/- |
| २२) | मौजे गुहिणी (खुळे वस्ती) | पोहोच रस्ता व त्यावरील मोरी बांधकाम करणे | ६,७७,०००/- |
| २३) | मौजे नानावळे | पोहोच रस्ता व त्यावरील मोरी बांधकाम करणे | ४,४९,०००/- |
| २४) | मौजे सांगवी (वेखो) | पोहोच रस्ता व त्यावरील मोरी बांधकाम करणे | ३६,२७,०००/- |
| | | **एकूण-** | **१,३४,२८,०००/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे यांनी नागरी सुविधा कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे यांचेकडे पतपत्र LOC व्दारे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प,५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते ) मध्ये जमा

करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३)इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१९-२०२० मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०६१५०५३३५८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2019.12.06 15:11:21 +05'30'

**( द.शं.मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी ( पुनर्वसन ), पुणे विभाग,
२. उप आयुक्त ( पुनर्वसन ), पुणे विभाग
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उप संचालक, पुणे
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
५. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
६. अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे

७. कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२

१०. नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.

११. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई ३२.

१२. महसूल व वन विभाग, पी.ए.सी. कार्यासन , मंत्रालय, मुंबई ३२.

१३. निवडनस्ती र-८, कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*****